महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, औरंगाबाद व नागपूर यांना सन २०२१-२२ मधील ठोक रक्कम वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एनएलयु-२०१७/प्र.क्र.१४४/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ जानेवारी, २०२२.

**संदर्भः-** (१) विभागाचा समक्रमांकाचा दि.२७.०६.२०१८ रोजीचा शासन निर्णय.
(२) महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व औरंगाबाद यांचे अनुक्रमे दि.१८.०८.२०२१, दि.०२.१२.२०२१ व दि.२०.१२.२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना** :

महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, औरंगाबाद व नागपूर या विधी विद्यापीठांना त्यांचा दैनंदिन प्रशासकीय व शैक्षणिक खर्च, मंजूर आकृतीबंधानुसार भरलेल्या पदांचे वेतन व त्याव्यतिरिक्त विद्यापीठांनी भरलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन, इ. करिता प्रत्येक विधी विद्यापीठास सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षे ठोक रक्कम म्हणून प्रति विद्यापीठ प्रति वर्ष रुपये ५ कोटी इतका निधी चार हप्त्यात उपलब्ध करुन देण्यास संदर्भीय क्र.१ शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

त्यास अनुसरुन महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०२१-२२ मधील तिसऱ्या हप्त्यातील (माहे ऑक्टोबर, २०२१ ते डिसेंबर, २०२१) ठोक रक्कमेचा निधी **रु.१,२५,००,०००/- (प्रति विद्यापीठ)** म्हणजेच रु.३,७५,००,०००/- **(अक्षरी रुपये तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त)** निधी मंजूर करुन उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, औरंगाबाद व नागपूर या विधी विद्यापीठांना त्यांचा दैनंदिन प्रशासकीय व शैक्षणिक खर्च, मंजूर आकृतीबंधानुसार भरलेल्या पदांचे वेतन व त्याव्यतिरिक्त विद्यापीठांनी भरलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन, इ. करिता महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, औरंगाबाद व नागपूर यांना सन २०२१-२२ मधील तिसऱ्या हप्त्यातील (माहे ऑक्टोबर, २०२१ ते डिसेंबर, २०२१) ठोक रक्कमेचा निधी **रु.१,२५,००,०००/- (प्रति विद्यापीठ)** म्हणजेच रु.३,७५,००,०००/- **(अक्षरी रुपये तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त)** इतका निधी वितरित करण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

२. (१) महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, औरंगाबाद व नागपूर यांना शासनाकडून मंजूर झालेला ठोक रक्कमेच्या दुसऱ्या हप्त्यातील रक्कम ही विद्यापीठ निधीत जमा करुन सदर अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर रक्कमेतून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन व त्यास

विद्यापीठाच्या वित्त समितीच्या मान्यतेने खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही संबंधित महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठांच्या कुलसचिव/ कुलगुरु यांनी करावी.

(२) विधी विद्यापीठांच्या कुलगुरु यांनी शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ ठोक रक्कम मंजूर करण्यात आलेली आहे, ही रक्कम त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आली आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची तसेच वित्त समितीची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व तपशीलवार खर्चाची माहिती उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास संदर्भीय शासन निर्णयातील नमूद अ.क्र.२ (९) येथे दिलेल्या वेळापत्रकानुसार विहित वेळेत सादर करावी.

(३) वरील सर्व ठोक रक्कमेची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विधी विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

(४) विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी ठोक रक्कम मंजूर केलेली आहे त्याच उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या ठोक रक्कमेचा वापर करावा.

(५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेला शासन निर्णय, क्रमांकः-भांखस२०१४/ प्र.क.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेच्या तरतूदीनुसार व अटीनुसार संबंधित विद्यापीठांनी प्रत्येक बाबनिहाय असलेल्या नियमानुसार खर्च करण्यात यावा. तसेच शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेला शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क.२१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दती धोरणामध्ये सुधारणा केली असून केंद्र शासनाने विकसित केलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती राज्य शासनास वस्तू व सेवा खरेदीसाठी स्वीकृत करण्यास मान्यता दिली आहे. तरी त्यानुसार गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन वस्तू व सेवा खरेदी करणे बंधनकारक राहिल. तसेच यासंदर्भात वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटींचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही संबंधित महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठाच्या कुलसचिव/ कुलगुरु यांनी करावी.

३. सदरहू मंजूर झालेली तरतूद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, औरंगाबाद व नागपूर या विद्यापीठास तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता संस्थेने सादर केली पाहिजेत. संस्थेस ज्या उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतच्या तपशीलवार खर्चाची माहिती व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत संदर्भीय शासन निर्णयात अ.क्र.२ (९) येथे दिलेल्या वेळापत्रकानुसार विहित वेळेत सादर करण्याची दक्षता संबंधित महाराष्ट्र

राष्ट्रीय विधी विद्यापीठाच्या कुलसचिव/ कुलगुरु यांनी घ्यावी. त्याशिवाय पुढील टप्प्यातील निधी विधी विद्यापीठांना वितरीत करण्यात येणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी

४. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची घालण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२१, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.१२२७/२०२१/व्यय-५, दि.३१.१२.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०१०७१६३६१२४७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9,
serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.01.07 16:37:04 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.कुलगुरू, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व औरंगाबाद.
३) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व औरंगाबाद.
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
५) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई विभाग.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई, पुणे.
९) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ BMS प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात यावा.
१४) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.